**अनुसूचित जमाती व पारंपारिक वननिवासी (वनहक्काची मान्यता) अधिनियम २००६ चे नियम २००८ आणि सुधारित नियम २०१२ ची काटेकोर अंमलबजावणी करुन वनहक्क दावे व अपीले यांचा निपटारा करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : वहका-२०१८/प्र.क्र.१३३/का-१४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- २८ डिसेंबर, २०१८

**वाचा:-** (१) अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वननिवासी (वन हक्कांची मान्यता ) अधिनियम, २००६ व नियम, २००८ आणि सुधारित नियम, २०१२.
(२) आदिवासी विकास विभाग,शासन परिपत्रक क्रमांक :वहका-२०१८/प्र.क्र.४३/का-१४, दि. ११ मे, २०१८
(३) आदिवासी विकास विभाग,शासन परिपत्रक क्रमांकःयाचिका-२०१६/प्र.क्र.१२४/का-१४, दि. ११ नोव्हेंबर, २०१६
(४) महसूल व वन विभाग, शासन परिपत्रक क्र. एस-१०/२०१६/प्र.क्र.४१७/फ-३, दि.०२ नोव्हेंबर, २०१६

**शासन परिपत्रक :-**

अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वन निवासी (वनहक्कांची मान्यता) अधिनियम , २००६ व नियम, २००८ आणि सुधारित नियम, २०१२ अन्वये अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वन निवासी यांना कलम ३(१) नुसार वैयक्तिक व सामूहिक वनहक्क किंवा दोहोंचे धारणाधिकार मिळण्याचे अधिकार प्राप्त झालेले आहेत. यामध्ये अनुसूचित जमाती किंवा इतर पारंपारिक वननिवासी यांना स्वत:च्या उपजीविकेकरिता शेती कसण्यासाठी वनजमिनी धारण करण्याचा व त्यामध्ये राहण्याचा हक्क; निस्तार सारखे हक्क; गावाच्या सीमांतर्गत किंवा सीमेबाहेर पारंपारिकरीत्या गोळा केले जाणारे गौण वनोत्पादन गोळा करणे, त्याचा वापर करणे किंवा त्याची विल्हेवाट लावणे यासाठी स्वामित्व हक्क; पाण्यामधील मत्स्य व अन्य उत्पादने, चराई करणे, पारंपारिक मोसमी साधनसंपत्ती मिळविण्यास हक्कदार असणे; निरंतर वापर करण्यासाठी पारंपारिकरीत्या संरक्षण व संवर्धन करण्यात आलेल्या कोणत्याही सामाजिक वनस्त्रोताचे संरक्षण, पुनर्निर्माण, संवर्धन, व्यवस्थापन करण्याचे हक्क इ. विविध वनहक्क प्राप्त झाले आहे.

२. उक्त अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वन निवासी (वनहक्कांची मान्यता ) अधिनियम , २००६ व नियम, २००८ आणि सुधारित नियम, २०१२ ची काटेकोरपणे अंमलबजावणी करुन प्रलंबित वनहक्क दावे व अपीले यांचा निपटारा करण्यासाठी संदर्भ क्र. २ येथील परिपत्रकान्वये "वनमित्र मोहीम" सुरू करण्यात आलेली आहे. तसेच अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वन निवासी (वनहक्कांची मान्यता) अधिनियम, २००६ व नियम, २००८ आणि सुधारित नियम, २०१२ मधील तरतूदींची तंतोतंत पालन करून वनहक्क दाव्यांची पडताळणी करणेबाबत संदर्भ क्र. ३ अन्वये सविस्तर सुचना देण्यात आल्या आहेत. संदर्भ क्र. २ अन्वये राबविण्यात येत असलेल्या "वनमित्र मोहीमेच्या" कार्यवाहीच्या अनुषंगाने मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचेकडून जिल्हानिहाय व्हिडीओ कॉन्फरन्सद्वारे वेळोवेळी आढावा घेण्यात येत आहे.

३. प्रस्तुत "वनमित्र मोहीमे" अंतर्गत अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वननिवासी (वनहक्कांची मान्यता) अधिनियम , २००६ व नियम, २००८ आणि सुधारित नियम, २०१२ अन्वये मोठया प्रमाणावर दावे व अपिले निकाली काढले जात असताना, पडताळणी प्रक्रियेमध्ये व दाव्यांच्या किंवा अपिलाच्या निकालानंतर करण्यात येणाऱ्या कार्यवाहीमध्ये काही उणिवा/त्रुटी असल्याचे तसेच वन विभागामार्फत तांत्रिक कारण देवून दावे/अपिले अमान्य करण्यात येत असल्याचे शासनाच्या निर्दशनास आले आहे. सदर उणिवांच्या/ त्रुटींची

पुर्तता करून अधिनियमातील तरतूदी विचारात घेऊन दावे व अपिले यांचा निपटारा करण्याबाबत मा. मुख्यंमत्री महोदय यांनी निर्देश दिले आहेत या निर्देशाच्या अनुषंगाने पुढीलप्रमाणे सविस्तर सुचना प्रसूत करण्यात येत आहेत.

१. वनहक्क कायद्यांतर्गत केवळ तांत्रीक कारणे देवून दावे/ अपिले नामंजूर करण्यात येवू नयेत. वन विभागाकडून अशाप्रकारे तांत्रीक कारणास्तव दावे नांमजूर करण्याचे प्रमाण जास्त असल्याने वन विभागाच्या संबधित अधिकाऱ्यांना अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वन निवासी (वनहक्कांची मान्यता) अधिनियम, २००६ व नियम, २००८ आणि सुधारित नियम, २०१२ मधील तरतूदींबाबत विशेष प्रशिक्षण देण्यात यावे.

२. लाभार्थ्याच्या प्रत्यक्ष ताब्यात असलेले कमाल ४ हेक्टरच्या मर्यादेत क्षेत्र मंजूर करावे.

३. मान्य करण्यात आलेल्या वनपट्टयाचे प्रमाणपत्र व ७/१२ उतारा लाभार्थ्यास तात्काळ उपलब्ध करून द्यावा. प्रत्यक्ष जमिनीची मोजणी करून संबधित लाभार्थ्यांचा पोटहिस्सा नमूद करून स्वतंत्र ७/१२ उतारा देण्यात यावा.

४. अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वन निवासी (वनहक्कांची मान्यता) अधिनियम, २००६ व नियम, २००८ आणि सुधारित नियम, २०१२ अंतर्गत वैयक्तीक वनहक्कधारकास प्राप्त झालेले प्रमाणपत्र व ७/१२ उताऱ्याच्या आधारावर बँकाकडून मिळणारी कर्जे तसेच इतर शासकीय योजनांतर्गत प्राप्त होणाऱ्या लाभासाठी पात्र आहेत याची नोंद घेण्याबाबत महसूल व वन विभागाच्या संदर्भ क्र. ४ येथील परिपत्रकान्वये निर्देश दिले असून ज्या जिल्ह्यांमध्ये वैयक्तिक वनहक्कधारकांना बँकाकडून कर्जे मिळण्यास अडचणी येत आहेत किंवा शासकीय योजनांचा लाभ मिळत नाही, अशा प्रकरणी जिल्हाधिकारी यांनी संबधित बँकेस आवश्यक सुचना देवून लाभार्थ्यांच्या अडचणी दूर कराव्यात व त्यांना कर्जे तसेच शासकीय योजनांचा लाभ मिळवून देण्यास उपाययोजना आखाव्यात.

५. उपविभागीय स्तरीय तसेच जिल्हास्तरीय समितीमध्ये असलेल्या अशासकीय सदस्यांनी बैठकीदरम्यान दिलेल्या सुचनांच्या अनुषंगाने अंतिम निर्णय घेताना त्या सुचना विचारात घ्याव्यात.

६. ज्या वैयक्तीक वनहक्क धारकांना जमिनीचे पट्टे प्राप्त झाले आहेत, त्यांना जमिन सुधारणा, शेतीपुरक व्यवसाय व उत्पन्न वाढीच्या योजनांचा प्राधान्यांने लाभ द्यावा. शासनाच्या कृषी व पदुम विभाग, आदिवासी विकास विभाग, ग्राम विकास विभागा इ. मार्फत राबविण्यात येणाऱ्या विविध योजनांकरीता लाभार्थी निवड करताना वैयक्तीक वनहक्क धारकांना प्राधान्य देण्यात यावे.

२. अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वन निवासी (वनहक्कांची मान्यता) अधिनियम, २००६ व नियम, २००८ आणि सुधारित नियम, २०१२ अंतर्गत कार्यवाही अचूकरित्या पुर्ण होईल याकडे लक्ष देऊन संबंधित विभागीय आयुक्त यांनी यापुर्वी संदर्भाधीन परिपत्रकांन्वये दिलेल्या सुचनांच्या अनुषंगाने व उपरोक्त सुचनांच्या अनुषंगाने उक्त अधिनियमाच्या अंमलबजावणीचा पंधरवाडी आढावा घ्यावा व त्याबाबतचा अहवाल आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांना सादर करावा.

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१८१२२८१७१०३५०८२४ असा आहे. हे शासन परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pandurang
Mahadu Raut

Digitally signed by Pandurang Mahadu Raut
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Tribal Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=136cc102e03660c61e3577e800c6edb8125d21d6c9d7742a980d024e919fa85c, cn=Pandurang Mahadu Raut
Date: 2018.12.28 17:19:20 +05'30'

**( पांडुरंग म. राऊत )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव

२) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव
३) मा. मंत्री ( सर्व ) महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव
४) मा. राज्यमंत्री ( सर्व ) महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव
५) मा. मंत्री , आदिवसी विकास, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव
६) मा. राज्यमंत्री, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव
७) मा. विरोधी पक्षनेता, विधानमंडळ, विधानभवन,विधानमंडळ सचिवालय, मुंबई
८) मा. संसद सदस्य ( सर्व )
९) मा. विधिमंडळ सदस्य ( सर्व )
१०) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
११) अपर मुख्य सचिव ( महसूल ) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१२) अपर मुख्य सचिव (कृषि ) कृषि व पदूम विभाग, मंत्रालय, मुंबई
१३) सचिव (पदुम ) कृषि व पदूम विभाग, मंत्रालय, मुंबई
१४) सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) सचिव, (ग्राम विकास ) ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक
१७) आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे-१
१८) प्रधान मुख्य वन संरक्षक (वन बल प्रमुख) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१९) सर्व विभागीय आयुक्त.
२०) सर्व जिल्हाधिकारी
२१) अपर आयुक्त, आदिवासी विकास , ठाणे, नाशिक, नागपूर, अमरावती
२२) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हापरिषद.
२३) सर्व उपविभागीय आधिकारी
२४) सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
२५) सर्व उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी,आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२
२६) निवड नस्ती.(का.१४) आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई.